**डॉ. बाबासाहेब आंबेडकर आंतरराष्ट्रीय विमानतळ, नागपूर येथील पोलीस उपायुक्त (इमिग्रेशन) हे एक पद अपर पोलीस आयुक्त, गुन्हे शाखा, नागपूर शहर यांचे अधीनस्त पोलीस उपायुक्त (डिटेक्शन) गुन्हे असे रुपांतरीत करणे..**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अेपीओ २६१५/प्र. क्र. २४३/पोल-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २८ जुलै २०१५

वाचा -

1. **शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-३१०८/६९७/प्र. क्र. २८४/पोल-३, दि.७.८.२००८.**
2. **पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र.पोमसं/२६-अ/४७/नागपूर श (इमिग्रेशन विभाग)/१८३/२०१५, दि.२१.७.२०१५ चे पत्र**
3. **पोलीस आयुक्त, नागपूर यांचे क्र.पोआना/जी-७/प्रस्ताव/पोउपआ पद/इमीग्रेशन/२०१५, दि.२६.६.२०१५ चे पत्र**

प्रस्तावना-

विभागाच्या शा.नि.क्र. अेपीओ-३१०८/६९७/प्र.क्र.२८४/पोल-३, दि.७.८.२००८ अन्वये पोलीस आयुक्त, नागपुर यांचे आस्थापनेवर डॉ. बाबासाहेब आंबेडकर आंतरराष्ट्रीय विमानतळ, नागपूर येथील इमिग्रेशन विभागाकरिता विविध संवर्गातील एकूण ५८ पदे मंजूर करण्यात आली होती. डॉ. बाबासाहेब आंबेडकर आंतरराष्ट्रीय विमानतळ, नागपूर येथील इमिग्रेशन विभाग दि.३०.४.२०१३ रोजी डायरेक्टर सबसिडरी इंटेलिजन्स ब्युरो, भारत सरकार, नागपूर यांचेकडे हस्तांतरीत झाला आहे. सदर विभागाचे कामकाज पोलीस उपआयुक्त, इमिग्रेशन यांचेकडून श्री. पद्मनाभन DCIO/Chief Immigration Officer, डॉ. बाबासाहेब आंबेडकर आंतरराष्ट्रीय विमानतळ, नागपूर यांनी घेतले आहे व त्याप्रमाणे ते काम करीत आहेत. डायरेक्टर सबसिडरी इंटेलिजन्स ब्युरो, भारत सरकार, नागपूर यांनी पोलीस उपायुक्त (इमिग्रेशन) या मंजुर पदाची मागणी केलेली नाही.

नागपूर शहरातील लोकसंख्येत मोठया प्रमाणात झालेली वाढ व त्याप्रमाणे गुन्ह्याचे प्रमाण देखील वाढलेले आहे. सद्यस्थितीत अपर पोलीस आयुक्त, गुन्हे हे पद रिक्त असल्याने नागपूर शहरातील गुन्हे शाखेचे सबलीकरण करण्याकरिता इमिग्रेशन विभागाकरिता मंजूर असलेल्या पोलीस उप आयुक्त यांचेकडे कार्यभार सोपविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

विभागाच्या शा.नि.क्र. अेपीओ-३१०८/६९७/प्र.क्र.२८४/पोल-३, दि.७.८.२००८ अन्वये पोलीस आयुक्त, नागपुर यांचे आस्थापनेवर डॉ. बाबासाहेब आंबेडकर आंतरराष्ट्रीय विमानतळ, नागपूर येथील इमिग्रेशन विभागाकरिता मंजूर केलेले पोलीस उप आयुक्त (इमिग्रेशन)-१ हे पद अपर पोलीस आयुक्त, गुन्हे शाखा, नागपूर शहर यांचे अधीनस्त पोलीस उपायुक्त (डिटेक्शन) गुन्हे असे रुपांतरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२८१७२९००६७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPT,CID - 918120, postalCode=400032, st=Maharashtra, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2015.07.28 17:31:13 +05'30'

**(द. ह. कदम)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. राज्यमंत्री (गृह/शहरे) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री (गृह/ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
४. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव
५. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
६. प्रधानसचिव (विशेष) यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
९. विशेष पोलीस महानिरीक्षक, नागपूर परीक्षेत्र, नागपूर
१०.पोलीस आयुक्त, नागपूर शहर
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२.निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
१४.सर्व सहसचिव/उपसचिव/अवरसचिव/कक्ष अधिकारी, गृह विभाग
१५.निवडनस्ती/पोल-३